प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (PM-POSHAN) योजनेतंर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा निधी वितरणाबाबत... (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ०८ मे, २०२४

**वाचा:-**

१) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२२-Desk (PMP) दि.३१ मार्च, २०२३

२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.४०/अर्थ -३, दि.१२ एप्रिल, २०२३.

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२२/प्र.क्र.१११/एस.डी.३, दि.१५ मे, २०२३.

४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.४०/अर्थ -३, दि.०८ डिसेंबर, २०२३

५) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२३-Desk (PMP) दि.१२ डिसेंबर, २०२३.

६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.१८ डिसेंबर, २०२३.

७) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२३-Desk (PMP) दि.१३ फेब्रुवारी, २०२४.

८) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.१६ फेब्रुवारी, २०२४.

९) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२३-Desk (PMP) दि.२२ मार्च, २०२४.

१०) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.२२ मार्च, २०२४.

११) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.३४/अर्थ -३, दि.०१ एप्रिल, २०२४.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर केंद्र हिस्स्याच्या निधीमधील तिसऱ्या हप्त्याचा रु.४१२३३.३१ लक्ष इतका निधी संदर्भाधिन दि.२२ मार्च, २०२४ रोजीच्या आदेशान्वये सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य शासनास उपलब्ध करुन दिला होता. केंद्र शासनाकडून तिसऱ्या हप्त्याकरीता प्राप्त झालेल्या

रु.४१२३३.३१ लक्ष केंद्र हिस्सा निधीच्या प्रमाणात रु.२४१६७.८० लक्ष राज्य हिस्साचा निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये वितरीत करणे आवश्यक होते. तथापि, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील सुधारित अर्थसंकल्पिय तरतूदीनुसार सर्वसाधारण लेखाशिर्षांतर्गत राज्य हिस्स्यामध्ये रु.१६६७३.४० लक्ष इतका निधी शिल्लक होता. सबब, केंद्र हिस्स्याचा रु.४१२३३.३१ लक्ष व राज्य हिस्स्याचा रु.१६६७३.४० लक्ष निधी शासन निर्णय दि.२२ मार्च, २०२४ रोजी वितरीत करण्यात आला आहे. यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा अवितरीत असलेला रु.७४९४.४० लक्ष इतका निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरणास मान्यता देण्याचा प्रस्ताव नियोजन विभागामार्फत वित्त विभागास करण्यात आला होता. सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार सर्वसाधारण घटकांतर्गच्या अवितरीत राज्य हिस्स्याचा रु.७४९४.४० लक्ष निधी सन २०२४-२५ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्साचा रु.७४९४.४० लक्ष (रुपये चौऱ्याहत्तर कोटी चौऱ्यांण्णव लक्ष चाळीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पित तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१- प्राथमिक शिक्षण, (०१) (१६) प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२ ३८१५) | रु.६२००३.५९ लक्ष | रु.७४९४.४० लक्ष |
| | **एकूण** | **रु.६२००३.५९ लक्ष** | **रु.७४९४.४० लक्ष** |

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१९५/१४७१, दि.०५/०४/२०२४ तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.९८/व्यय-५, दि.१६/०४/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत निधीच्या उपयोजनाकरीता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, राज्य समन्वय अधिकारी, प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, स्वतंत्र कक्ष, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी केंद्र व राज्य शासनने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/परिपत्रक/सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०८१२२२५३४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2024.05.08 12:35:22 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे

१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर

१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई

१९) नियोजन विभाग, कार्यासन १४७१, मंत्रालय, मुंबई

२०) निवड नस्ती - एस.डी. ३